**महाराष्ट्रामधील ई-डिस्ट्रीक्ट प्रकल्पाखाली देण्यात येणा-या सेवांबाबत कार्यपध्दती**

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक मातंरां २०१०/प्र.क्र.१६४/३९
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २ फेब्रुवारी, २०११

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय ई-गव्हर्नन्स योजने खालील ई-डिस्ट्रीक्ट हा एक मिशन मोड प्रकल्प आहे. राज्य शासनाच्या माहिती तंत्रज्ञान पायाभूत सुविधेचा पुरेपूर वापर करणे आणि नागरीकांना सामुहिक केंद्रीभूत सुविधा देणे हे ई-डिस्ट्रीक्टचे उद्दिष्ट आहे.

"ई-डिस्ट्रीक्ट" हे संकेत स्थळाद्वारे सेवा देणारे व्यापक भव्य द्वार आहे. हे शासनाच्या सेवा देणारे 'इलेक्ट्रॉनिक गेटवे' असून सामान्य माणसावर केंद्रीत करुन सार्वजनिक सेवा देण्याकरीता ई-डिस्ट्रीक्ट पोर्टलची पुनर्बांधणी केली आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शनानुसार ई-डिस्ट्रीक्टची उद्दिष्टे पुढील प्रमाणे आहेत:-

(अ) शासन सेवा देण्याच्या पध्दतीत सुधारणा करुन गुणवत्ता वाढविणे
(ब) जिल्हा प्रशासनाची सेवा देण्याच्या पध्दतीमधील कार्यक्षमता वाढविणे
(क) महा ई-सेवा केंद्राद्वारे नागरीकांना द्यावयाच्या शासन सेवांची व्याप्ती वाढविणे
(ड) जिल्हा पातळीवर मध्यवर्ती माहिती कोष तयार करणे त्याचा उपयोग सर्व स्तरावर तपशिल आणि माहिती गोळा करणे, साठवणे, पुन्हा प्राप्त करणे, वापरणे आणि आपापसात अदानप्रदान करण्यासाठी करणे

पुणे, नागपूर, लातूर, नांदेड आणि सिंधुदुर्ग या जिल्हयात पायलट मोडवर प्रकल्प राबविण्यात येत असून ही पध्दत यशस्वी झाल्यानंतर त्याच पध्दतीने राज्यभर ही योजना पुढे राबविण्यात येईल. या प्रकल्पाखाली सुरवातीला दयावयाच्या सात सेवा पुढील प्रमाणे आहेत:-

i) मिळकतीचे प्रमाणपत्र
ii) तात्पुरता रहिवास / रहिवास प्रमाणपत्र
iii) वय, राष्ट्रीयत्व आणि अधिवास प्रमाणपत्र
iv) ऐपतदारी प्रमाणपत्र
v) ज्येष्ठ नागरीक प्रमाणपत्र
vi) जन्माबाबत दाखला
vii) मृत्युबाबतचा दाखला

**शासन निर्णय:-**

ई डिस्ट्रीक्ट प्रकल्पाद्वारे द्यावयाच्या शासन सेवा या ऑन लाईन द्यावयाच्या आहेत. याकरीता शासनाने कार्यपध्दती निश्चित केली असून वरील प्रस्तावनेतील सात सेवा सुविधा देण्याबाबत पुढील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात आला आहे.

२. उपरोक्त सात सेवांचा लाभ घेण्याकरीता अर्जदाराला पुढील तीन पैकी कोणत्याही पध्दतीचा वापर करता येईल.
**अ) ऑनलाईन:-** अर्जदाराने ई-डिस्ट्रीक्ट आज्ञावलीमधील फॉर्म भरुन अर्ज ऑनलाईन सादर केल्यास याबरोबर आवश्यक आधारभूत कागदपत्र स्कॅन करुन सादर करण्यात यावेत.

**ब) महा ई-सेवा केंद्र:-** अर्जदाराने महा ई-सेवा केंद्राकडे अर्ज केल्यास त्याबरोबर आधारभूत मूळ कागदपत्रे सादर करावीत अर्जदाराने सादर केलेला अर्ज आणि मूळ कागदपत्र यांच्या आधारे महा ई-सेवा केंद्र चालकाने ई-डिस्ट्रीक्ट आज्ञावलीमध्ये आवश्यक अर्ज आणि स्कॅन कागदपत्रे ऑन-लाईन सादर करावीत.

**क) तहसिलदार /गटविकास अधिकारी कार्यालय:-** अर्जदाराने तहसिलदार /गटविकास अधिकारी कार्यालयाकडे अर्ज केल्यास त्याबरोबर आधारभूत कागदपत्रे सादर करावीत. अर्जदाराने सादर केलेला अर्ज आणि मूळ कागदपत्र यांच्या आधारे सदर कार्यालयाने ई-डिस्ट्रीक्ट आज्ञावलीमध्ये आवश्यक अर्ज आणि स्कॅन कागदपत्रे ऑन-लाईन सादर करावीत.

३. अर्जदाराचा अर्ज आणि आवश्यक आधारभूत कागदपत्रे ऑन लाईन सादर केल्यानंतर अर्जदाराला ई-डिस्ट्रीक्ट आज्ञावलीत सादर केलेल्या कागदपत्रांबाबतची पोच फाईलक्रमांकाच्या स्वरुपात देण्यात येईल. या फाईल क्रमांकाच्या आधारे अर्जदाराला त्याच्या अर्जाची सद्य:स्थिती अथवा अर्जाचा शोध वेळोवेळी घेता येऊ शकेल.

४. जोपर्यंत आधारभुत कागदपत्रे ई-डिस्ट्रीकट डाटाबेस मध्ये स्कॅन स्वरुपात उपलब्ध आहेत तोपर्यंत अर्जदाराला आधारभूत कागदपत्रे मूळ स्वरुपात सादर करण्याची आवश्यकता नाही. तथापि ज्या मूळ कागदपत्रांची कालमर्यादा संपली आहे किंवा मुदत निघून गेली आहे. (उदा. आयकर प्रमाणपत्र ज्याची मुदत एक वर्षाकरीता असते) अशी आधारभूत कागदपत्रे मुळ स्वरुपात सादर करणे आवश्यक राहील.

५. ऑन लाईन अर्जाबाबत देण्यात येणा-या प्रमाणपत्रावर डिजीटल सही करण्याचा अधिकार, नांव आणि पदनामासह प्रमाणपत्र देणा-या प्राधिकाराचा राहील. सदर प्रमाणपत्र डिजीटल सहीने देण्यात आले आहे असे स्पष्ट करण्यात यावे याकरीता वेगळया सही-शिक्क्याची आवश्यकता रहाणार नाही. या प्रमाणपत्राची ई-डिस्ट्रीक्ट आज्ञावलीतील फाईल क्रमांकाद्वारे पडताळणी करण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०११०२०११८४८०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**(सु. ह. जाधव)**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
महालेखापाल-१( लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
महालेखापाल-१( लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
शासनाचे मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव
विकास आयुक्त,उद्योग/ सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालये
महामंडळे, मंडळे
निवड नस्ती कार्या-३९